**महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयेग, कोकण/ नाशिक/ पुणे/ नागपूर/अमरावती/औरंगाबाद या महसूली विभागीय कार्यालयांसाठी "नियंत्रक अधिकारी" घोषित करणे...**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक.आरटीएस-२०२१/प्र.क्र.२९५/लो.दि.कक्ष**
मंत्रालय, विस्तार इमारत, ६ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०९ मार्च, २०२२.

वाचा :- १) ) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.आरटीएस-२०१६/प्र.क्र.१२४ (१)/१८ (र. व का.), दि.३० जुलै, २०१६
२) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.आरटीएस-२०१७/प्र.क्र.४८/१८ (र. व का.), दि.१३ एप्रिल, २०१७.
३) सामान्य प्रशासन विभाग शासन आदेश क्र.आरटीएस-२०१९/प्र.क्र.९१/१८ (र. व का.), दि.१४ नोव्हेंबर, २०१९.
४) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.आरटीएस-२०२१/प्र.क्र.१५८/लो.दि.कक्ष, दि.२३ नोव्हेंबर, २०२१.
५) राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयाचे अ.शा.पत्र क्र.विआका-२०२१/प्र.क्र.७१/मुसेहआ, दि.२८ डिसेंबर, २०२१.
६) सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र.आरटीएस-२०२१/प्र.क्र.२९५/लो.दि.कक्ष, दि.२५ जानेवारी, २०२२.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम, २०१५ च्या कलम १३ मधील तरतूदीनुसार संदर्भाधिन दि.३० जुलै, २०१६ रोजीच्या अधिसूचनेन्वये "महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग" घटित करण्यात आलेला आहे. सदर आयोगामध्ये एक मुख्य सेवा हक्क आयुक्त व सहा महसूली विभागांसाठी (कोकण/ नाशिक/ पुणे/ नागपूर/अमरावती/औरंगाबाद) करिता प्रत्येकी एक राज्य सेवा हक्क आयुक्त यांचा समावेश आहे. त्यानुसार राज्य सेवा हक्क आयुक्त,नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद या पदावर संदर्भाधिन शासन अधिसूचना दि.२३ नोव्हेंबर, २०२१ अन्वये नेमणुका करण्यात आल्या असून संबंधित आयुक्तांनी दि.०१/१२/२०२१ रोजी पासून त्यांचा पदभार स्विकारला आहे. सदर कार्यालये नियमितरित्या कार्यान्वित होईपर्यंत, सुरुवातीच्या वित्तीय/आर्थिक बाबींच्या अडचणींच्या अनुषंगाने तसेच या पाच कार्यालयांसाठी स्वतंत्र आहरण व संवितरण अधिकारी नियुक्त होईपर्यंत राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक/ पुणे/ नागपूर/ अमरावती/ औरंगाबाद या ५ कार्यालयांसाठी वित्तीय/आर्थिक बाबींकरिता संबंधित विभागीय आयुक्त (महसूल) यांच्या कार्यालयाचे **"आहरण व संवितरण अधिकारी" आणि "नियंत्रक अधिकारी"** यांना तात्पुरत्या स्वरुपात **पुढील आदेश होईपर्यंत** संबंधित राज्य सेवा हक्क आयोग, महसूली विभाग या कार्यालयांचे **"आहरण व संवितरण अधिकारी" आणि "नियंत्रक अधिकारी"** म्हणून घोषित करण्यास दि.२५ जानेवारी, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. आता राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयाने महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग, कोकण/नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद या महसूली विभागीय कार्यालयात उप सचिव पदावर अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्ती नियुक्ती झाल्यानंतर सदर उप सचिव/सह सचिव यांना **"नियंत्रक अधिकारी"** म्हणून घोषित करण्याबाबत संदर्भाधिन दि.२८ डिसेंबर, २०२१ रोजीच्या अर्ध शासकीय पत्रान्वये कळविले आहे. त्याअनुषंगाने शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय** :-

महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग, कोकण/नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद या महसूली विभागीय कार्यालयात **उप सचिव पदावर अधिकाऱ्यांची प्रतिनियुक्तीने नियुक्ती झाल्यानंतर सदर उप सचिव / सह सचिव (उप सचिव हे पद भविष्यात सह सचिव पदात श्रेणी उन्नत झाल्यास)** यांना महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोगाच्या सबंधित महसूली विभाग कार्यालयाचे **"नियंत्रक अधिकारी"** म्हणून घोषित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सद्य:स्थितीत संदर्भाधिन दि.२५ जानेवारी, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्य सेवा हक्क आयोग, नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद या ५ कार्यालयांसाठी वित्तीय/आर्थिक बाबींकरिता तात्पुरत्या स्वरुपात पुढील आदेश होईपर्यंत "नियंत्रक अधिकारी" म्हणून घोषित करण्यात आलेले संबंधित विभागीय आयुक्त (महसूल) यांच्या कार्यालयाचे "नियंत्रक अधिकारी" हेच राहतील.

३. तसेच, भविष्यात महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग, कोकण/नाशिक/पुणे/नागपूर/ अमरावती/ औरंगाबाद या महसूली विभागीय कार्यालयात उप सचिव पदावर मंत्रालयातील कोणत्याही विभागातील उप सचिवाचे पद धारण करणाऱ्या किंवा राज्य शासनाच्या कोणत्याही कार्यालयातील उप सचिव पदाचे समतुल्य पद धारण करणाऱ्या अधिकाऱ्याची प्रतिनियुक्तीने नियुक्ती झाल्यानंतर व सदर अधिकाऱ्यांनी उप सचिव पदाचा कार्यभार स्वीकारलेल्या कालावधीनंतर प्रशासकीय कारणास्तव त्यांची सदर पदावरील प्रतिनियुक्ती समाप्त करुन त्यांना कार्यमुक्त करण्यात आल्यास व त्यामुळे सदर उप सचिवाचे पद रिक्त झाल्यास सदर रिक्त पदावर सदर पदाच्या सेवाप्रवेश नियमानुसार अन्य अधिकाऱ्याची प्रतिनियुक्तीने नियुक्ती होईपर्यंत व त्यांनी सदर पदाचा कार्यभार स्वीकारलेल्या दिनांकापर्यंतच्या कालावधीत महाराष्ट्र राज्य सेवा हक्क आयोग, कोकण/नाशिक/पुणे/नागपूर/अमरावती/औरंगाबाद येथील विभागीय कार्यालयांसाठी राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयातील "उप सचिव" तसेच उप सचिव हे पद भविष्यात सह सचिव पदात श्रेणी उन्नत झाल्यास "सह सचिव" हे "नियंत्रक अधिकारी" राहतील.

तसेच हे अधिकार वित्तीय बाबीपुरतेच मर्यादीत राहतील.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाने त्यांचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक २४१/२०२१/कोषा प्रशा-५, दि.०६/०१/२०२२ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२२०३१०१५१९२४७७०७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

JANA JIVA VALVI

Digitally signed by JANA JIVA VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=816d3fe4c7042f66b4ac73a1f0087cd8fda3e115d42dc8b54c0e783064c80dc1, pseudonym=BC7303629AB7AFCA8CE15C55D2BEFE77F3006E6E, serialNumber=FD6F9785FE220B2C0F30D422D401E2DFC838A0D9EC621401534F5B36EAF57F26, cn=JANA JIVA VALVI
Date: 2022.03.10 15:20:10 +05'30'

**( ज.जि.वळवी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. राज्य सेवा हक्क आयुक्त, नाशिक/नागपूर/पुणे/अमरावती/औरंगाबाद ( राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त कार्यालयामार्फत)

३. सर्व विभागीय आयुक्त (महसूल), महाराष्ट्र राज्य.
४. प्रधान महालेखापाल (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, वांद्रे, मुंबई.
७. उप सचिव, राज्य मुख्य सेवा हक्क आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई.
८. उप सचिव / अवर सचिव, कार्यासन-२६, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक/नागपूर/पुणे/अमरावती/औरंगाबाद
११. कक्ष अधिकारी, कार्यासन व्यय-४/कोषा प्रशा-५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (लो.दि.कक्ष)